औरंगाबाद महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण), २०२१ नियमांमधील सुधारणेस मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- औमपा-२०२३/प्र.क्र.६/नवि-२४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १५ फेब्रुवारी, २०२३

**वाचा:-** १) शासन निर्णय क्र.औमपा-२०१५/प्र.क्र.२१०/(भाग-२)/नवि-२४, दि.२६.८.२०२१
२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांचे पत्र दि.३०.१२.२०२२.

**प्रस्तावना:-**

औरंगाबाद महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर सेवाप्रवेश नियमात लिपीक-टंकलेखक या पदासाठी कायमस्वरुपी संवर्ग बदली ५% मध्ये फक्त वाहन चालक या पदाचा समावेश करण्यात आलेला आहे. तर, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), विद्युत पर्यवेक्षक, सहाय्यक नगररचनाकार व स्वच्छता निरीक्षक या पदांच्या नेमणूकीची अर्हता ही १०० टक्के नामनिर्देशन/सरळसेवेने दर्शविलेली आहे. त्यामुळे त्या संवर्गापेक्षा कनिष्ठ संवर्गातील इतर कर्मचाऱ्यांना पदोन्नतीची संधी राहिलेली नाही. यामुळे या पदांच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत सुधारणा करण्याबाबत आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.२ अन्वये शासनाकडे प्रस्ताव सादर केला आहे.

२. आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांचा प्रस्ताव तसेच या विभागामार्फत महानगरपालिकेंकरिता तयार करण्यात आलेले मॉडेल सेवा प्रवेश नियम, २००८ विचारात घेऊन संदर्भीय दि.२६.८.२०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-२” मध्ये नमूद उक्त पदांच्या नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीसंदर्भात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भीय दि.२६.८.२०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-२” मध्ये, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५४, ४५५ व ४६५(१)(ला) अन्वये प्राप्त अधिकारानुसार, औरंगाबाद महानगरपालिका सेवाप्रवेश नियमात लिपीक-टंकलेखक, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), विद्युत पर्यवेक्षक व स्वच्छता निरीक्षक या पदांच्या सेवाप्रवेश नियमात दर्शविलेल्या संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयामधील “परिशिष्ट-२” मध्ये सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर सुधारीत “परिशिष्ट-२ अनुसूची-अ” मध्ये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. या नियमावलीस “औरंगाबाद महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१” असे संबोधण्यात यावे.

३. सदर सुधारित नियमावली आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावी. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पुर्तता आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२१५१८२२५११३२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.02.15 18:28:14 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद.

३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) निवडनस्ती ( नवि-२४ ).

## “परिशिष्ट-२ अनुसूची-अ”

## औरंगाबाद महानगरपालिका सुधारीत सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३

| से.प्र. नियम अ.क्र. | पदनाम | सेवा प्रवेश नियमानुसार | | प्रस्तावित सुधारणा | |
|---|---|---|---|---|---|
| | | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी (नामनिर्देश/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीच्या पध्दती व अर्हता | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी (नामनिर्देश/ पदोन्नती/ प्रतिननियुक्ती) | नेमणुकीच्या पध्दती व नेमणूकीची अर्हता |
| ७. | लिपीक टंकलेखक | कायमस्वरुपी संवर्ग बदलीने ५ % | महानगपालिकेच्या आस्थापनेवरील वाहन चालक पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या व नामनिर्देशनासाठी अर्हता धारण करणाऱ्या तसेच विभागीय परीक्षा उत्तीर्ण असणाऱ्या कर्मचाऱ्याची एकत्रित सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे कायमस्वरुपी संवर्ग बदलीने नियुक्ती करता येईल. | कायमस्वरुपी संवर्ग बदलीने-५% | महानगपालिकेच्या आस्थापनेवरील वाहन चालक पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या व नामनिर्देशनासाठी अर्हता धारण करणाऱ्या तसेच विभागीय परीक्षा उत्तीर्ण असणाऱ्या कर्मचाऱ्याची एकत्रित सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे कायमस्वरुपी संवर्ग बदलीने नियुक्ती करता येईल. तथापि, वाहनचालक संवर्गातून उमेदवार उपलब्ध न झाल्यास पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २० | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) | नामनिर्देशन १०० % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य (civil) अभियांत्रिकी शाखेची पदवी.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. | नामनिर्देशन ७५ % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य (civil) अभियांत्रिकी शाखेची पदवी.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | | | पदोन्नती २५ % | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक/अतिक्रमण निरीक्षक संवर्गातील किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या व कनिष्ठ अभियंता व्यावसायीक परीक्षा उत्तीर्ण असलेल्या कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

| से.प्र. नियम अ.क्र. | पदनाम | सेवा प्रवेश नियमानुसार | | प्रस्तावित सुधारणा | |
|---|---|---|---|---|---|
| | | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी (नामनिर्देश/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीच्या पध्दती व अर्हता | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी (नामनिर्देश/ पदोन्नती/ प्रतिननियुक्ती) | नेमणुकीच्या पध्दती व नेमणूकीची अर्हता |
| ३० | विद्युत पर्यवेक्षक | नामनिर्देशन १०० % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची विद्युत (Electrical) अभियांत्रिकी शाखेचीप पदविका किंवा महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची शालांत प्रमाणपत्र परीक्षा (S.S.C) उत्तीर्ण, शासनमान्य औद्योगिक संस्थेचे तारतंत्री अभ्यासक्रम पूर्ण व तद्नंतर एन.सी.टी. व्ही.टी.चे प्रमाणपत्र आवश्यक.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. | नामनिर्देशन ७५ % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची विद्युत (Electrical) अभियांत्रिकी शाखेची पदविका किंवा महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची शालांत प्रमाणपत्र परीक्षा (S.S.C) उत्तीर्ण, शासनमान्य औद्योगिक संस्थेचे तारतंत्री अभ्यासक्रम पूर्ण व तद्नंतर एन.सी.टी.व्ही.टी. चे प्रमाणपत्र आवश्यक.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | | | पदोन्नती २५ % | विद्युत लाईनमन (तारमार्गतंत्री विद्युत) संवर्गातील किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या व विद्युत पर्यवेक्षक परीक्षा उत्तीर्ण असलेल्या कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ५० | स्वच्छता निरीक्षक | नामनिर्देशन/ सरळसेवा १०० % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी.<br>ब) स्वच्छता निरीक्षक पदविका उत्तीर्ण.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. | नामनिर्देशन ५० % | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी.<br>ब) स्वच्छता निरीक्षक पदविका उत्तीर्ण.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | | | खातेअंतर्गत परीक्षा निवडीने ५० % | नामनिर्देशनासाठीची अर्हता धारण करणाऱ्या औरंगाबाद महानगरपालिकेच्या चतुर्थश्रेणी संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून सरळसेवेने भरती करावयाच्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन निवड करता येईल. |

*************************************************